महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील अधिकाऱ्याची बदली / पदस्थापना ...

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन आदेश क्रमांक : बदली-१३१५/प्र.क्र.३४६/(२०)/सेवा २**

गो.ते.रुग्णालय इमारत संकुल, दहावा मजला

मंत्रालय, मुंबई

दिनांक : ३० सप्टेंबर, २०१५

**आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-**२००५** मधील कलम **४ (४)** (दोन) व कलम **४(५)** मधील तरतुदी तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक **११.२.२०१५** रोजीच्या परिपत्रकामधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ६६००) मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील अधिकाऱ्याची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे : -

| अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीचे कारण | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| डॉ.सीमा पारवेकर, वैद्यकीय अधीक्षक, ग्रामीण रुग्णालय, पारशिवणी, जिल्हा नागपूर | विनंतीनुसार | वैद्यकीय अधीक्षक, डागास्मृती स्त्री रुग्णालय, नागपूर ( रिक्त पदी ) |

२. संबंधित अधिकाऱ्यांनी दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या परिपत्रक क्र. सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सुचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची नोंद घ्यावी.

४. बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्यासाठी अधिकाऱ्यांनी त्यांच्या बदलीच्या पदावर दिलेल्या मुदतीत तात्काळ रुजू व्हावे. त्यांचे पुढील वेतन व भत्ते रुजू होणाऱ्या पदावरच काढण्यात येतील याची संबंधीतांनी दक्षता घ्यावी अन्यथा संबंधीताना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

५. संचालनालयाने जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार सदर प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१५०९३०१७११२५५२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.09.30 19:59:44 +05'30'

(वि.पुं.घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई,
२) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई,
३) उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर,
४) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, नागपूर,
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता) महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर,
७) अधिक्षिका, स्त्री रुग्णालय, डागा स्मृती रुग्णालय, नागपूर,
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
९) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक,
१०) मा.प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) यांचे स्वीय सहायक
११) संबंधीत अधिकारी (द्वारा संचालक, आरोग्य सेवा, मुंबई)
१२) निवड नस्ती (सेवा-२)